**सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळामध्ये घरेलू कामगारांची नोंदणी/ नुतणीकरण वाढविण्याकरिता जाहिरातीच्या माध्यमातून, माहिती, प्रचारप्रसिध्दी, जनजागृती करण्यासाठी जाहिरात माध्यम आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - घरेलू-१२२२/प्र.क्र.६१/कामगार-७अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ ऑगस्ट, २०२४.

**वाचा:-**

१. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे इतिवृत्त क्र. वृत्तचित्र शाखा/का-७, दिनांक २९.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळ अधिनियम २००८, अन्वये राज्यात घरेलू कामगार मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळामार्फत घरेलू कामगारांची नोंदणी करण्यात येवून, त्यांच्यासाठी कल्याणकारी योजना राबविण्यात येते. सदर घरेलू कामगारांची नोंदणी/नुतणीकरण वाढविण्यासाठी जाहिरात व प्रसिध्दीच्या माध्यमातून जनसामान्यांपर्यंत पोहचविणे. या उद्देशाकरिता माहीती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत जाहिरातीद्वारे प्रसार व प्रसिध्दी करुन, प्रभावी अंमलबजावणी करण्याचे कार्य कामगार विभागाकडून करण्यात येते. त्याअनुषंगाने, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांनी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळामध्ये घरेलू कामगारांची नोंदणी/ नुतणीकरण वाढविणेकरीता जनजागृती करण्यासाठी केल्याप्रमाणे रु. ४,९९,५९,०००/- (अक्षरी रु. चार कोटी नव्व्याण्णव लाख एकोणसाठ हजार फक्त) इतक्या रकमेच्या जाहिरात माध्यम आराखड्यास मान्यता दिली आहे. सदर केल्याप्रमाणे रु. ४,९९,५९,०००/- (अक्षरी रु. चार कोटी नव्व्याण्णव लाख एकोणसाठ हजार फक्त) इतक्या रकमेच्या जाहिरात माध्यम आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय : -**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळ अधिनियम २००८, या कायद्याची प्रभावी अंमलबजावणी करणे, तसेच महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळामार्फत घरेलू कामगारांची नोंदणी / नुतणीकरण वाढविणे यासाठी जाहिरात व प्रसिध्दीच्या माध्यमातून जनसामान्यांपर्यंत पोहचविणे. या उद्देशाकरिता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने रु. ४,९९,५९,०००/- (अक्षरी रु. चार कोटी नव्व्याण्णव लाख एकोणसाठ हजार फक्त) इतक्या रकमेच्या जाहिरात माध्यम आराखडयास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

माध्यम आराखड्याचा तपशील खालील प्रमाणे:-

| माहिती व जनसंपर्क महासंचालनालय | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळ प्रस्तावित माध्यम आराखडा | | | | | | | | |
| जाहिरात प्रसिध्दी तपशील (Details of Advertisement) | | | | | | | | |
| अ. क्र | Media | मूळ दर, प्रक्रिया | Details | वारंवारिता | संख्या दिवस | एकूण अंदाजित रक्कम ( सर्व करांसहित) | जीएसटी | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित) |
| | समाज माध्यमे व डिजिटल माध्यमे (नव माध्यम शाखा) | | | | | | | |
| १) | सोशल मिडीया | विहित ई-निविदा प्रक्रिये द्वारे | शासन निर्णय दि. २३.११.२०२३ मधील संस्थाच्या सूचीमधील संस्थामार्फत विहीत कार्यपद्दतीचे अवलंब करुन प्रसिद्दी करणे शक्य होईल. या माध्यमांच्या संस्थेनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिद्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | १,००,००,०००/- | १८,००,०००/ | १,१८,००,०००/ |
| २) | डिजिटल मिडीया | विहित ई-निविदा प्रक्रिये द्वारे | शासन निर्णय दि. २३.११.२०२३ मधील संस्थाच्या सूचीमधील संस्थामार्फत विहीत कार्यपद्दतीचे अवलंब करुन प्रसिद्दी करणे शक्य होईल. या माध्यमांच्या संस्थेनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिद्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | १,००,००,०००/- | १८,००,०००/ | १,१८,००,०००/ |
| | बाह्य माध्यमे (प्रदर्शने शाखा) | | | | | | | |
| १) | मोबाईल एलईडी व्हॅन द्वारे राज्यभर प्रसिद्दी | विहित ई-निविदा प्रक्रिये द्वारे | शासन निर्णय दि. २३.११.२०२३ मधील संस्थाच्या सूचीमधील संस्थामार्फत विहीत कार्यपद्दतीचे अवलंब करुन प्रसिद्दी करणे शक्य होईल. या माध्यमांच्या संस्थेनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिद्दी करण्याचे प्रस्तावित. | अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | २,०९,५०,०००/ | ३७,७१,०००/- | २,४७,२१,०००/ |
| | Total | | | | | ४,०९,५०,०००/ | ७३,७१,०००/- | ४,८३,२१,०००/ |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | शा. नि. दि. १३.८.२०२१ नुसार रु. ५.०० कोटी इतक्या रकमेपर्यंत च्या प्रसिद्दी आराखड्यास एकूण खर्चाच्या ४% (रु. २० लाख) आणि त्यापेक्षा प्रत्येक वाढीव रकमेसाठी २% (उर्वरित रकमेवर (रु. ५ कोटी वजाजाता) प्रमाणे | शासन निर्णय तरतुदी नुसार | माहिती व जनसंपर्क महासंचालनायाला येणारा कार्यालयीन उपकरणावरील खर्च, सॉफ्टअवेर, तात्पुरता मनुष्यबळावरील खर्च, संशोधन खर्च, वाहतूक खर्च, इतर किरकोळ खर्च | | | १६,३८,०००/- | | १६,३८,०००/- |
| | TOTAL EXPENDITURE | | | | | ४,२५,८८,०००/ | | ४,९९,५९,०००/- |

०३. सदर देयकांचा खर्च या विभागाच्या मागणी क्र. के-४, मुख्यलेखाशीर्ष २२३०-कामगार व सेवायोजन या लेखाशीर्षाखालील (२२३० ५३४५) या मधून सन २०२४-२५ या वर्षासाठी करण्यात आलेल्या तरतुदी मधून करण्यात येईल अथवा घरेलू कामगार कल्याण मंडळाकडे शासकीय अनुदान मधून जो निधी संचित आहे त्यातून करण्यात येईल.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्रक्र ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग दोन यामधील अ.क्र. ८, नियम क्र.१७ (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०५. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने यानुषंगाने संबंधित जाहिरात एजन्सी/आस्थापनांना कार्यादेश देण्याच्या अनुषंगाने पुढील कार्यवाही करावी.

०६.  विकास आयुक्त (असंघटित कामगार), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त नमूद देयकांबाबत कोणत्याही प्रकारचा विलंब न करता शासनास सादर करावीत.

०७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०२४०८०६१६५१५११०१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KARANSING PREMSING PATIL

Digitally signed by KARANSING PREMSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7FEED7178D6C14666A5DF36811F1763590E65B6F836A87E63789DC234173D66, cn=KARANSING PREMSING PATIL
Date: 2024.08.06 17:07:47 +05'30'

**( क. प्रे. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) मा. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) मा.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
८ ) उप सचिव (कामगार-७ अ) उद्योग, ऊर्जा, खनिकर्म व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा, खनिकर्म व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) विकास आयुक्त (असंघटित कामगार) यांचे कार्यालय, प्रभादेवी, मुंबई-१३
११) महालेखापाल -१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४) निवडनस्ती (कामागार-७ अ), उद्योग, ऊर्जा, खनिकर्म व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.